**भाषा संचालनालयातील सहायक भाषा संचालक/विभागीय सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली), गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांची दि. ०१.०१.२०१९ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
शासन निर्णय क्रमांक:- भाज्येसू-२०२०/प्र.क्र.२८/आस्था-२
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२३

वाचा -

१) शासन परिपत्रक समक्रमांक दिनांक १८.०२.२०२०.

२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/बारा, दि. २१.०६.२०२१ अन्वये प्रसिद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१.

३) शासनपत्र क्र. भासंप-२०१५/प्र.क्र.६/आस्था-२, दिनांक २१ मार्च, २०२३.

**शासन परिपत्रक -**

भाषा संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहायक भाषा संचालक/विभागीय सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली), गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांची दिनांक १.०१.२०१९ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची वाचा येथील क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आली आहे. सदर ज्येष्ठतासूचीस श्री. गिते यांनी उपस्थित केलेले आक्षेप वाचा येथील क्र. ३ च्या शासनपत्रान्वये निकाली काढण्यात आले आहेत. सबब, वाचा क्र. २ येथील महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ नुसार "सहायक भाषा संचालक/विभागीय सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली), गट-ब या संवर्गामधील अधिकाऱ्यांची दिनांक ०१.०१.२०१९ रोजीची वाचा येथील क्र. १ च्या शासन परिपत्रकान्वये प्रसिद्ध करण्यात आलेली तात्पुरती ज्येष्ठता सूची या परिपत्रकान्वये अंतिम करण्यात येत आहे.

२. भाषा संचालनालयामधील सहायक भाषा संचालक/विभागीय सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली), गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांची दिनांक ०१.०१.२०१९ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची सोबत जोडलेल्या "विवरणपत्र-अ" नुसार खालील अटींच्या अधीन राहून प्रसिद्ध करण्यात येत आहे-

(१) दि. ०१.०१.२०८ ते दि. ३१.१२.२०१८ या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या अधिकाऱ्यांची नावे सदर ज्येष्ठतासूचीमध्ये समाविष्ट आहेत. दि. ३१.१२.२०१७ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या अधिकाऱ्यांची नावे या ज्येष्ठतासूचीमधून वगळण्यात आली आहेत.

(२) ज्येष्ठतासूचीतील अधिकाऱ्यांच्या नावासमोर नमूद केलेला ज्येष्ठतेचा दिनांक हा फक्त सहायक भाषा संचालक/विभागीय सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली), गट-ब या संवर्गातील

ज्येष्ठता निश्चित करण्याकरिता विचारात घेण्यात येईल. सदर दिनांकाच्या अनुषंगाने आर्थिक लाभांची अनुज्ञेयता प्रचलित धोरणाच्या अधीन असेल.

(३) मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दिनांक ०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. सदर निर्णयाविरुद्ध मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून सदर ज्येष्ठतासूची प्रसिद्ध करण्यात येत आहे.

(४) सदरहू ज्येष्ठतासूची, मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २५१८१/२०१८ च्या अधीन राहून तसेच, मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज क्र. ८६२/२०१६ मधील न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने कार्यवाहीच्या अधीन राहून प्रसिद्ध करण्यात येत आहे.

३. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक व त्यासोबतची ज्येष्ठतासूची संबंधित सहायक भाषा संचालक / विभागीय सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) यांच्या (रजेवर असलेल्या / सेवानिवृत्त झालेल्या अधिकाऱ्यांसह) तात्काळ निदर्शनास आणावे.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेताक २०२३०३२९१५५३५९५५३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VAISHALI LAHU WAGHMARE

Digitally signed by VAISHALI LAHU WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a04bc63dad109dbcf1f43d6ad6a6b5f92b8f2c67d44331739500eba2bdfc622, pseudonym=E1BFA1A05AFD2F8E8BE45C3B7FCA1A87900F4192, serialNumber=F557034494093273E810D83B4B4760417E6293A17606F1295B2E68D6F099E122, cn=VAISHALI LAHU WAGHMARE
Date: 2023.03.29 16:34:03 +05'30'

(वैशाली वाघमारे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संबंधित सहायक भाषा संचालक / विभागीय सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली) (भाषा संचालनालयामार्फत)
२. भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. निवडनस्ती.

<u>विवरणपत्र "अ"</u>

शासन परिपत्रक क्रमांकः भाज्येसू-२०२०/प्र.क्र.२८/आस्था- २, दिनांक२९ मार्च, २०२३सोबतचे विवरणपत्र

१. संवर्गाचे नांव : सहायक भाषा संचालक/विभागीय सहायक भाषा संचालक (अनुवाद व शब्दावली), गट -ब

२. एस- १५ : ४१८००-१३२३००/ एस-१६ : ४४९००-१४२४००

३. दि.१ जानेवारी, २०१९ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची (दि. ०१.०१.२०१८ ते दि. ३१.१२.२०१८ या कालावधीत कार्यरत अधिकाऱ्यांची)

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | शासकीय अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | जन्मदिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | सहायक भाषा संचालक (अ.व श.) या पदावरील नियुक्तीचा मार्ग | सहायक भाषा संचालक (अ.व श.) या पदा वरील नियुक्तीचा/ पदोन्नतीचा/ ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक (दिनांक-महिना-वर्ष) | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय/शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | १ | श्रीम.वि.ल.डोनीकर | खुला | २६.०९.१९६७ | सरळसेवा | ०६.०३.२०१२ | ३०.०९.२०२५ | एम.ए. (मराठी) | शा.नि.दि.३१.१०.२०१९ अन्वये भाषा उपसंचालक (अ.व श.) पदावर पदोन्नती |
| २ | २ | श्री. अ. वा. गिते | वि.जा.भ. ज.(वैध) | ०२.०२.१९६९ | सरळसेवा | ०२.०७.२०१२ | २८.०२.२०२७ | एम.ए. (मराठी) एल.एल.बी | म. लो. आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून नियुक्ती |
| ३ | ३ | श्रीम. नं.दि. पूरव | खुला | २३.१०.१९६० | पदोन्नती | १३.१०.२०१५ | ३१.१०.२०१८ | एम.ए. (मराठी)) | सेवानिवृत्त |
| ४ | ४ | श्री. क. गो. कांबळे | अ.जा. (वैध) | ०६.०४.१९६० | पदोन्नती | २१.०६.२०१६ | ३०.०४.२०१८ | बी.ए. (मराठी) | सेवानिवृत्त |
| ५ | ५ | श्री. ह. म. सुर्यवंशी | अ.ज. (वैध) | ०९.०७.१९७५ | सरळसेवा | २४.०६.२०१६ | ३१.०७.२०३३ | एम.ए.बी.एड | म. लो. आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून नियुक्ती |